

गुलियेल्मो मार्कोनी
(1874 - 1937)
रेडिओ संशोधक
PING!
ZAP!
POW!
कडाडणाऱ्या विजेमध्ये विद्युत शक्ती असते, हे फ्रँकलिन आता सिद्ध करणार.
हुशार आहे पोर!
त्याने काही काळ नौदलात काम केलं पाहिजे.
लहान असताना *गुलियेल्मो* संशोधक बेंजामिन फ्रँकलिन यांच्या पात्राचे सोंग घेऊन त्यांचे विद्युत प्रयोग करत असे. त्यामुळे त्याचे इटालियन पिता वैतागत असत..
बघ आई, मी तारांशिवाय घंटी वाजवू शकतो!
एकदा रात्री उशीरा....
बॅटरी
ठिणगी स्रोत
ट्रान्समीटर
रेडिओ लहरी!
ही तर जादूच झाली!
भो!
रेडिओ लहरी!
शांत राहा, मी झोपतोय.
बॅटरी
BATTERY
रिसीव्हर
मग त्याने *हेनरिक हर्ट्झ* यांच्या विद्युतचुंबकीय लहरींबद्दल वाचले. गुलियेल्मेच्या मनात आले, या लहरींमार्फत, *ट्रान्समीटर* आणि *रिसीव्हर* यांच्यामध्ये बिनतारी संदेश पाठवता येईल. या कल्पनेने त्याला अगदी झपाटून टाकले. त्याने हर्ट्झचे प्रयोग वारंवार घरी करून पाहिले.
रुमाल फडकवतोयस की खेळतोयस?
श्श! मी आराम करतेय.
गधड्यांनो, आवाज करू नका!
त्याचा भाऊ अल्फान्सो त्याला मदत करू लागला. तो त्यांच्या बागेत रिसीव्हर घेऊन वाट बघत बसे. संदेश पोहोचल्यावर तो रुमाल फडकवून संदेश पाठवणाऱ्या पोटमाळ्यावरच्या गुलियेल्मोला इशारा करत असे.
बँग!
BANG!
बंदुकीचा आवाज! त्याने माझा संदेश ऐकला वाटतं.
एरियल
खट! खट! खट!
गप्प बस!
लवकरच, गुलियेल्मो दूर अंतरावर उभ्या असलेल्या अल्फान्सोला संदेश पाठवण्यात यशस्वी झाला.




गुलियेल्मोने इटलीतील एका पोस्ट ऑफीसला आपला प्रयोग दाखवला. पण त्यांना त्यात रस वाटला नाही.




मग गुलियेल्मो इंग्लंडला गेला. तेथील टपाल खात्याने त्याला पैशाची तसेच तांत्रिक मदतही केली.




गुलियेल्मोचे प्रयोग यशस्वी झाले. 1897 साली त्याने *वायरलेस टेलिग्राफ अँड सिग्नल* या कंपनीची स्थापना केली. 1898 मध्ये कंपनी रेडिओ बनवू लागली. 1909 साली *एस्.एस्.रिपब्लिक* जहाज दुसऱ्या एका जहाजाला धडकले. त्यावेळी रेडिओ संपर्क यंत्रणेमुळे सर्व 1700 प्रवाशांचे जीव वाचवण्यात यश आले.




गुलियेल्मो इटलीत परतला तेव्हा त्याचे हिरोसारखे स्वागत झाले. लवकरच, रेडिओ लहरीचे अनेक नवनवे उपयोग शोधण्यात आले. रेडिओचा *व्हाल्व्ह* रेडिओ लहरींचा बारकाईने शोध घेऊन त्यांचे उत्तम प्रसारण करत असे. 1920 साली *ब्रिटीश ब्रॉडकास्टिंग कॉर्पोरेशनने (बीबीसीने)* रेडिओवर करमणुकीचे कार्यक्रम सुरू केले. पण गुलियेल्मोला त्यात अजिबात रस नव्हता. त्याला आपल्या शोधाचा उपयोग समुद्रात अडकलेल्या लोकांचे जीव वाचवण्यासाठी करायचा होता. रेडिओचे इतर सगळे उपयोग त्याला क्षुल्लक वाटत असत.